**जलक्रांतीचे जनक माजी मुख्यमंत्री स्वर्गीय शंकरराव चव्हाण यांच्या जन्मशताब्दीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. शताब्दी-२०१९/प्र.क्र.१३५/२९अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक:- २२ जानेवारी, २०२०.

**प्रस्तावना:-**

माजी मुख्यमंत्री, स्व.शंकरराव चव्हाण हे राज्यसभा, लोकसभा, विधान परिषद आणि विधानसभा अशा केंद्र व राज्यातील चारही प्रतिनिधीगृहांचे सन्माननीय सभासद राहिलेले होते. महाराष्ट्र राज्याच्या जडणघडणीमध्ये सिंहाचा वाटा असलेले माजी मुख्यमंत्री स्वर्गीय शंकरराव चव्हाण यांची कारकीर्द कोणीही विसरू शकणार नाही. सत्ता ही बहुजन हितार्थ राबवावी हा थोर स्वातंत्र्य सेनानी स्वामी रामानंद तीर्थ यांनी दिलेला कानमंत्र अखेरपर्यंत त्यांनी सांभाळला. शून्यातून विश्व निर्माण करणारे, कर्तव्यनिष्ठ, लोकाभिमुख, निष्कलंक चारित्र्य असलेले, दूरदृष्टी आणि विचार यांचा समन्वय साधणारे, घेतलेल्या कामात पूर्ण झोकून देऊन काम करणे हे त्यांचे वैशिष्ठय होते.

**"पाणी अडवा पाणी जिरवा"** ही त्यांची घोषणा बोधवाक्य ठरली, **जलसंस्कृतीचे जनक** असा त्यांचा गौरवपूर्ण उल्लेख करण्यात येतो, अनेक प्रकल्पांच्या पूर्ततेसाठी भगीरथ प्रयत्न केल्यामुळे त्यांचे "**आधुनिक भगीरथ**" म्हणून वर्णन करण्यात येते. तसेच **सचिवालयाचे** "**मंत्रालय**" असे नामकरण स्वर्गीय शंकरराव चव्हाण यांच्या कारकीर्दीत झाले. त्यांचे व्यक्तिमत्व, नेतृत्व आणि कर्तृत्व समाजाला सदैव सर्जनशीलतेची, उद्यमशीलतेची आणि सुसंस्कारांची सदोदित प्रेरणा देत राहील. तसेच त्यांच्या कारकीर्दीत महाराष्ट्राची भरीव प्रगती झाली. अशा थोर पुरुषाचे जन्मशताब्दी वर्ष साजरे करण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. याबाबत खालील कार्यक्रम हाती घेण्याचे प्रस्तावित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

**अ)** दि.१४ जुलै, १९२० हा स्व.शंकरराव चव्हाण माजी मुख्यमंत्री यांचा जन्मदिवस असल्यामुळे दि. १५ जुलै, २०१९ ते दि. १४ जुलै, २०२० पर्यंत त्यांचे जन्म शताब्दी वर्ष हे विविध कार्यक्रमाच्या माध्यामातून साजरे करून त्यांच्या कार्याचा उजाळा करण्यात यावा.

**ब)** स्व.शंकरराव चव्हाण माजी मुख्यमंत्री यांच्या जलक्रांती विषयक विचारांना चालना देवून महाराष्ट्र दुष्काळ मुक्त करून पाण्याने समृध्द करण्यात यावा. त्यांच्या संकल्पनेला प्रत्यक्ष कृतीमध्ये आणण्यासाठी त्यांच्या विचारांचा प्रचार व प्रसार व्हावा यासाठी माहिती व जनसंपर्क संचालनालय यांनी आवश्यक ती तरतूद करून घ्यावी.

स्वर्गीय शंकरराव चव्हाण माजी मुख्यमंत्री यांच्या जन्मशताब्दी प्रित्यर्थ विविध कार्यक्रम राबविण्याकरिता संबंधित प्रशासकीय विभागांनी खालील कार्यक्रम हाती घेण्याचे प्रस्तावित करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | कार्यक्रमाची रूपरेषा व स्वरुप | कार्यवाही करणारा संबंधित प्रशासकीय विभाग |
|---|---|---|
| १ | माजी मुख्यमंत्री स्वर्गीय शंकरराव चव्हाण यांच्या स्मृती प्रित्यर्थ संदर्भग्रंथ प्रकाशित करणे | माहिती व जनसंपर्क संचालनालय |
| २ | माजी मुख्यमंत्री स्वर्गीय शंकरराव चव्हाण यांच्या स्मरणार्थ लोकराज्य विशेषांक काढणे. | माहिती व जनसंपर्क संचालनालय |
| ३ | नांदेड शहरात शंकरराव चव्हाण विष्णूपूरी प्रकल्पाजवळ माजी मुख्यमंत्री स्वर्गीय शंकरराव चव्हाण यांचे स्मारक उभारणे. | ग्राम विकास विभाग/ सार्वजनिक बांधकाम विभाग |
| ४ | माजी मुख्यमंत्री स्वर्गीय शंकरराव चव्हाण यांच्या स्मरणार्थ नांदेड शहरात ग्रंथालय, स्पर्धापरिक्षा मार्गदर्शन केंद्र त्याचप्रमाणे मुला-मुलींचे वसतीगृह उभारणे. | उच्च व तंत्र शिक्षण विभाग/ सार्वजनिक बांधकाम विभाग |
| ५ | माजी मुख्यमंत्री स्वर्गीय शंकरराव चव्हाण यांच्या स्मृती प्रित्यर्थ भोकर जि.नांदेड येथे राज्य मंत्रीमंडळाने सन २००९-२०१० मध्ये दिलेल्या मान्यतेनुसार पोलिस प्रशिक्षण केंद्र सुरू करणे. | गृह विभाग/ सार्वजनिक बांधकाम विभाग |
| ६ | जलसंपदा, जलसंधारण आणि पाणीपुरवठा क्षेत्रात उत्कृष्ट काम करणाऱ्या व्यक्तींना माजी मुख्यमंत्री स्वर्गीय शंकरराव चव्हाण यांच्या नावे जलभूषण पुरस्कार प्रदान करणे. | समन्वय जलसंपदा विभागाव्दारे करण्यात यावा. |

संबंधित विभागांनी उपरोक्त प्रमाणे कार्यक्रम राबविण्याकरिता आवश्यक ती प्रशासकीय मान्यता घ्यावी, व त्यानुसार आगामी अर्थसंकल्पीय अधिवेशनात आवश्यक ती तरतूद उपलब्ध करुन घ्यावी. तसेच उपरोक्त कार्यक्रमांच्या अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा बैठक मा. मंत्री महोदय (सा.बां.) हे घेतील. सर्व संबंधित विभागांनी त्यानुसार कार्यवाही करावी.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१२२१६४६०६२००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VALVI JANA JIVA

Digitally signed by VALVI JANA JIVA
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=4f7e685e5023c557d69a50fc6a7ce3fcacf9e46a5a03106a47b930f7e1c3052c, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=fd6f9785fe220b2c0f30d422d401e2dfc838a0d9ec621401534f5b36eaf57f26, ou=FINANCE DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VALVI JANA JIVA
Date: 2020.01.22 16:47:17 +05'30'

**( ज. जि. वळवी )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,

२. मा. मुख्यमंत्री याचें प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा.मंत्री ( सा. बां.) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई,
५. मा.राज्यमंत्री (सा.प्र.) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई,
६. मा.राज्यमंत्री (सा.बां.), यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई,
७. मा.विरोधी पक्षनेता विधानपरिषद / विधानसभा,
८. सर्व सन्माननीय विधानपरिषद सदस्य/ विधानसभा सदस्य,
९. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक,
१०. सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव,
११. सचिव (प्र.सु. व र.व.का.)सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई
१२. महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई,
१३. महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र-२, नागपुर,
१४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई,
१५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर,
१६. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर,
१७. उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत ३), मंत्रालय, मुंबई,
१८. उप सचिव, वित्त विभाग (व्यय-४ / व्यय-१० / अर्थसंकल्प-१४), मंत्रालय, मुंबई,
१९. उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग ( २९अ), मंत्रालय, मुंबई,
२०. सह संचालक (वित्त व कोषागारे), नागपूर,
२१. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर/नांदेड,
२२. उपसंचालक, नगर रचना, नागपूर/नांदेड,
२३. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड,
२४. निवडनस्ती (का-२९अ) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.